**मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठातील बी व सी विंग, ॲनेक्स इमारतीतील न्यायालयाकरिता नवीन हार्डवेअर खरेदी करण्याच्या प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा-२०२२/प्र.क्र.३४/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०२३.

**<u>संदर्भ</u>:-** १) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय दिनांक ०१.०८.२०११.
२) मा. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद यांचे पत्र क्र.N/cash/१५६२/२०२२, दिनांक १०.०२.२०२२.
३) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ३०.०३.२०२२.
४) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Com./Sec./२१/२०२२, दिनांक ०९.०६.२०२२.
५) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक २९.०७.२०२२.
६) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Com./Sec./३९/२०२२, दिनांक १९.०९.२०२२.
७) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ०६.१०.२०२२.
८) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Comp./Sec./४७/२०२२, दिनांक १५.१०.२०२२.
९) दिनांक २४.०२.२०२३ रोजीच्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
१०) समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक २८.०३.२०२३.
११) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Comp./Sec/१९/२०२३, दिनांक ०२.०६.२०२३.

**<u>प्रस्तावना</u> :-**

मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठ येथील संगणक सन २०१३-१४ व २०१८ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आले होते. तथापि, शासनाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०११ च्या शासन निर्णयान्वये संगणक साहित्य व इतर हार्डवेअर सामुग्री यांचा कार्यकाल हा पाच वर्षांकरीता निश्चित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने सन २०१३-१४ व २०१८ या वर्षात वितरीत करण्यात आलेली संगणक सामग्रीचा कार्यकाल संपुष्टात आल्याने त्याऐवजी नवीन हार्डवेअर सामग्री उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक २ नुसार मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद न्यायालयाकडून प्राप्त झाला होता. तद्नंतर सुधारित प्रस्ताव संदर्भ क्रमांक ६ व ८ अन्वये सादर करण्यात आला. दिनांक २४.०२.२०२३ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत नवीन

हार्डवेअर सामग्री खरेदीकरिता रु.५,९६,९३,३३६/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली.

त्यानुसार दिनांक २८.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर दिनांक २८.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या खर्चामध्ये Internet Leased Line (1 Gbps) साठी रु.२४,४६,५००/- इतक्या रकमेच्या खर्चाचा समावेश आहे. तथापि, Internet Leased Line करीता रु.२४,४६,५००/- इतक्या रकमेच्या खर्चास शासन निर्णय दिनांक १८.०५.२०२३ अन्वये स्वतंत्रपणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

यास्तव दिनांक २८.०३.२०२३ च्या शासन निर्णयामधील Internet Leased Line या बाबीच्या खर्चाची रक्कम वगळून तपशीलवार सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे आवश्यक आहे. तसेच संदर्भाधीन क्र. ११ च्या केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी बाबनिहाय (itemwise) प्रशासकीय मान्यता देण्याची या विभागास विनंती केली आहे. त्यानुसार दिनांक २८.०३.२०२३ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून याबाबत पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठातील बी व सी विंग, ॲनेक्स इमारतीतील न्यायालयाकरीता नवीन हार्डवेअर खरेदी करण्यासाठी रु.५,७२,४६,८३६/-(अक्षरी रु. पाच कोटी बाहत्तर लक्ष शेहचाळीस हजार आठशे छत्तीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संगणक सामग्री खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Hardware Name | Quantity | Rate | Total Amount |
|---|---|---|---|---|
| 1 | All-in-one PC's (SSD – 256GB) with Anti Virus Software, Large Screen & Touch | 70 | 1,02,750/- | 71,92,500/- |
| 2 | All-in-one PC's (SSD – 256GB) with Anti Virus Software | 140 | 74,400/- | 1,04,16,000/- |
| 3 | All-in-one PC's with Ubuntu O. S. | 400 Ubuntu | 53,000/- | 2,12,00,000/- |
| 4 | Multi Function Device | 44 | 53,888/- | 23,71,072/- |
| 5 | Laser Printers | 504 | 16,155/- | 81,42,120/- |
| 6 | Line Printers | 02 | 2,40,000/- | 4,80,000/- |
| 7 | High Speed Scanners | 22 | 30,500/- | 6,71,000/- |
| 8 | 600 VA UPS | 610 | 2,891/- | 17,63,510/- |
| 9 | 20 KVA Online UPS - 2 | 02 | 2,92,857/- | 5,85,714/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 10 | Display Boards for Court Halls | 26 | 70,000/- | 18,82,000/- |
| 11 | Consolidated Display Boards | 24 | 78,550/- | 18,85,200/- |
| 12 | Anti Virus for Windows PC,s (with 5 years validity) | 210 | 3,132/- | 6,57,720/- |
| | | | **Total** | **5,72,46,836/-** |

३. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार GeM पोर्टलवरुन विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये तसेच भाग-१ उप विभाग-३ मधील परिच्छेद क्रमांक २७ (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२२१६१९३५०९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.06.22 16:21:38 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. मा. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,

९. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
११. संचालनालय, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड,के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
१३. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. निवड नस्ती.